**महसूल विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या नवीन सेवापुस्तकांना/दुय्यम सेवापुस्तकांना मुळ सेवापुस्तक म्हणून ग्राह्य धरण्यास मंजुरी देण्याबाबतचे अधिकार महसूल विभागातील संबंधित सह सचिव / उप सचिव यांना पुन: प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग

शासन निर्णय क्रमांक : दुसेपु-२०१७/प्र.क्र.००६/ई-११,

मंत्रालय, पहिला माळा, हुतात्मा राजगुरु चौक,

मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ३२.

दिनांक : ०८ मे, २०१७.

**संदर्भ :** **१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.:सेवापु-२०१२/प्र.क्र.८/सेवा-६, दिनांक १६.०८.२०१२.**
**२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.:सेवापु-२०१२/प्र.क्र.८/सेवा-६, दिनांक १३.११.२०१३.**

**प्रस्तावना:-**

मंत्रालय इमारतीस दिनांक २१.०६.२०१२ रोजी लागलेल्या आगीत महसूल व वन विभाग व या विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांची सेवापुस्तके नष्ट झाली आहेत. सदर अधिकारी व कर्मचारी यांचे नवीन सेवापुस्तक तयार करुन त्यास मुळ सेवापुस्तक म्हणून ग्राह्य धरण्यास वा अधिकारी/कर्मचारी यांचेकडे उपलब्ध असलेल्या दुय्यम सेवापुस्तकातील नोंदी अद्ययावत करुन त्यास मुळ सेवापुस्तक म्हणून ग्राह्य धरण्यास मान्यता देण्याबाबतचे प्रस्ताव संदर्भीय शासन परिपत्रकातील निर्देशाप्रमाणे प्रशासकीय विभागाच्या सचिव/प्रधान सचिव यांना सादर करण्यात येतात. महसूल विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या अशा नवीन सेवापुस्तकांना/दुय्यम सेवापुस्तकांना मुळ सेवापुस्तक म्हणून ग्राह्य धरण्यास मंजुरी देण्याबाबत प्रधान सचिव (महसूल/मुद्रांक शल्क व नोंदणी) यांना असलेले अधिकार महसूल विभागातील संबंधित सह सचिव/उप सचिव यांना पुन: प्रत्यार्पित करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दिनांक २१.०६.२०१२ च्या आगीच्या दुर्घटनेनंतर वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ वरील शासन परिपत्रकान्वये प्रधान सचिव (महसूल/मुद्रांक शल्क व नोंदणी) यांना महसूल विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या नवीन सेवापुस्तकांना/दुय्यम सेवापुस्तकांना मुळ सेवापुस्तक

म्हणून ग्राह्य धरण्यास मंजुरी देण्याबाबत प्राप्त अधिकार महसूल विभागातील संबंधित सह सचिव/उप सचिव यांना पुन: प्रत्यार्पित करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. वरील अधिकारांच्या पुन: प्रत्यार्पणानंतरही संबंधित सह सचिव/उप सचिव यांनी घेतलेल्या निर्णयांबाबत प्रधान सचिव (महसूल/मुद्रांक शल्क व नोंदणी) हे **"मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुख"** म्हणून पुनर्विलोकन करुन फेर आदेश किंवा सुधारित आदेश देऊ शकतील. तसेच, याप्रमाणे अधिकारांच्या पुन: प्रत्यार्पणानंतरही प्रधान सचिव (महसूल/मुद्रांक शल्क व नोंदणी) यांचे याबाबतच्या प्रकरणी निर्णय घेण्याचे अधिकार अबाधित राहतील.

३. महसूल विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या नवीन सेवापुस्तकांना/दुय्यम सेवापुस्तकांना मुळ सेवापुस्तक म्हणून मान्यता देताना संदर्भ क्रमांक २ वरील शासन परिपत्रकान्वये निर्गमित केलेल्या सुचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. १ वरील शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.:सेवापु-२०१२/प्र.क्र.८/सेवा-६, दिनांक १६.०८.२०१२ मधील तरतुदींच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर संकेतांक क्रमांक २०१७०५०८१५२१०३८८१९ वर उपलब्ध करण्यात आला असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशांनुसार व नांवाने,

Manu Kumar Srivastava
Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2017.05.08 17:43:56 +05'30'

**(मनु कुमार श्रीवास्तव)**
प्रधान सचिव (महसूल/मुद्रांक शल्क व नोंदणी),
महाराष्ट्र शासन.

प्रति :

१. मा. राज्यपाल महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. मंत्री (महसूल) / मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१०. सर्व विभागीय आयुक्त.
११. सर्व जिल्हाधिकारी.
१२. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. सर्व कोषागार अधिकारी.
१६. निवड नस्ती, महसूल व वन विभाग/ई-११.